# इस्लाम

## एक सर्वंकष न्याय

लेखक : सय्यद अबुल आला मौदूदी
भाषांतर : झाहिद आबिद खान

(१९६२ साली हजयात्रेकरूंच्या संमेलनात या भाषणाचे मक्का येथे वाचन करण्यात आले होते.)

## सत्याच्या आवरणात असत्य

अल्लाहने मनुष्याची निर्मिती इतक्या उत्तमरीत्या केली आहे की त्याला ईश चमत्कारच मानायला हवे. म्हणूनच तो सैतानाच्या उघड उघड बहकावण्याच्या प्रयत्नाला सहज बळी पडत नाही. सैतान नाईलाजास्तव उपद्रव निर्माण करण्याच्या दुष्ट हेतूने कल्याणकारी स्वरुप धारण करून मानवाची दिशाभूल करण्याचा प्रयत्न करतो. स्वर्गात (जन्नतमध्ये) असताना आदम (अ.) यांना ''स्वर्गातून बाहेर पडण्याकरिता अल्लाहची अवज्ञा करा.'' असा उघड सल्ला न देता ''चला मी तुम्हाला असा वृक्ष दाखवितो ज्यास अमरत्व व अंतहीन शाहीवैभव प्राप्त आहे.'' असे सांगून फसविले.

मानवी स्वभावात आजही हाच कमकुवतपणा दिसून येतो. आजही मानवाच्या हातून ज्या चुका व अपराध घडत आहेत ते सर्व असत्य व फसव्या प्रलोभनाद्वारे घडविले जात आहेत.

## पहिले प्रलोभन : भांडवलदारी व धर्मनिरपेक्ष लोकशाही

वर्तमानकाळात सामाजिक न्यायाचे निमित्त दाखवून मानव समाजाची भयंकर दिशाभूल करण्यात येत आहे. दुराचारी (सैतानी) प्रवृत्तीच्या लोकांनी समाजाला सर्वप्रथम व्यक्तीस्वातंत्र्य व उदारमतवादाच्या प्रलोभनात गुंतवून ठेवले. अठराव्या शतकात भांडवलदारी व धर्मनिरपेक्ष लोकशाहीची स्थापना करण्यात आली. या समाजव्यवस्थेचे एवढे जबरदस्त प्रस्थ होते की त्यास मानवी जीवनाच्या उन्नतीचे शिखर समजले जात होते. स्वत:स प्रगत म्हणवून घेणारी प्रत्येक व्यक्ती स्वत:स व्यक्तीस्वातंत्र्य व उदारमतवादाचा पुरस्कर्ता मानत होती. मानवी जीवनाकरिता योग्य अशी कोणती समाजव्यवस्था असेल तर ती म्हणजे पाश्चात्य देशांत अस्तित्वात असलेली भांडवलदारी व धर्मानिरपेक्ष लोकाशाही होय, असा लोकांचा समज झाला होता.

मात्र अल्पकाळातच लोकांच्या लक्षात आले की या समाजविधातक व्यवस्थेने संपूर्ण जगात अराजकता निर्माण केली आहे. लवकरच या दुष्ट समाजव्यवस्थेचा अंत झाला.

## दुसरे प्रलोभन : सामाजिक न्याय व साम्यवाद

काही काळानंतर सामाजिक न्याय व साम्यवादाच्या नावाने लोकांची दिशाभूल करण्यासाठी नव्या समाजव्यवस्थेची स्थापना करण्यात आली. या नव्या शासनव्यवस्थेने जगातील विविध देशांत अत्याचार व दडपशाहीचे इतके भयंकर वातावरण निमार्ण केले की ज्याचे इतिहासातील कुठल्याही समाजव्यवस्थेशी साम्य दर्शविता येणार नाही. ही दृष्ट समाजव्यवस्था आजही बऱ्याचशा देशांत अस्तित्वात आहे, कारण तिचे खरे विनाशक स्वरुप अद्याप तेथील लोकांच्या लक्षात आलेले नाही.

## सुशिक्षित मुस्लिमांची बौध्दिक गुलामगिरी

ईश ग्रंथ 'कुरआन' व प्रेषित मुहम्मद (स.) यांचे उपदेश (अहादीस) मानवाच्या मार्गदर्शनासाठी जगाच्या अंता (कयामत) पर्यंत ईश्वर सुरक्षित ठेवणार आहे. त्यांच्याद्वारे मानवास दुष्कर्मापासून (सैतानी प्रवृत्तीपासून) दूर ठेवण्यात येणार आहे. त्यांच्या आधारे जीवनाच्या सर्वच क्षेत्रांतील अडीअडचणीत मानवाचे मार्गदर्शन होत राहणार आहे. परंतु ही दुर्दैवी माणसे आपल्या धर्माच्या तत्त्वांचा अज्ञानामुळे विघातक नवविचारांनी अत्यंत प्रभावित होत आहेत. त्यामुळे जगातील सबळ प्रगत देशांकडून दिल्या गेलेल्या घोषणांचा प्रतिध्वनी लगेच येथेही ऐकू येत आहे. फ्रान्समधील वैचारिक क्रांतीने मुस्लिम देशातील सुशिक्षित लोक प्रभावित होऊन तशाच विचारांचा उहापोह करू लागले व त्याच प्रकारच्या विचारांचा अवलंबही करण्याची सुरुवात केली. त्यांना वाटे की जर आपण तसे वागलो नाही तर लोक आपणास मागासलेले व पुरातनवादी समजतील. ही विचारसरणीसुध्दा कालांतराने संपुष्टात आली.

तद्नंतर आधुनिक विचारांचे सुशिक्षित लोक एका वेगळ्याच दिशेला वळू लागले. या नव्या युगाच्या आरंभाने मुस्लिमांमध्ये सामाजिक न्याय व साम्यवादाचे विचार वाढू लागले. इथपर्यंत तर ठीक होते, परंतु स्वत: मुस्लिमांमध्ये एक गट असा निर्माण झाला जो इस्लामी तत्त्वज्ञानात परिवर्तन घडवून आणण्याचा प्रयत्न करू लागला. इस्लामच्या कक्षेबाहेर न जाता इस्लामचे अंतरंग बदलून आधुनिक विचारांचा त्यात समावेश करू पाहत होते. असे परिवर्तन करून इस्लामला 'कालबाह्य धर्मा'च्या आरोपातून मुक्त करू पाहत होते. त्यांनी व्यक्तीस्वातंत्र्य, उदारमतवाद तसेच भांडवलदारी व धर्मनिरपेक्ष लोकशाहीची पाश्चात्य

जीवनशैलीसुध्दा इस्लामी तत्त्वप्रणालीत सुदृढ आहे असे सिध्द करण्याचे प्रयत्न सुरु केले. या विचारधारेच्या आधारे हे सिध्द करण्याचे प्रयत्न होऊ लागले की इस्लाममध्येसुद्धा साम्यवादी सामाजिक न्यायव्यवस्था अस्तित्वात आहे. अशा विचारधारेचे सुशिक्षित मुस्लिम बौध्दिक गुलामी व अज्ञानाच्या शिगेला पोहचले होते.

## सर्वंकष न्यायव्यवस्था म्हणजे काय?

या संक्षिप्त लेखात मी आपणापुढे सर्वंकष न्यायव्यवस्था म्हणजे काय व ती कशा प्रकारे अंमलात आणली जावी याबाबत खुलासा करीत आहे. मात्र जे लोक साम्यवादास सामाजिक न्यायव्यवस्था कायम करण्याचा एकमेव मार्ग मानून तिचाच अवलंब करण्याचा आग्रह करीत आहेत, ते आपली चूक मान्य करून आपला हट्ट सोडून देतील. याबद्दल मी साशंक आहे. कारण जोपर्यंत अज्ञानी केवळ अज्ञानी वा असमंजस असतो तोपर्यंत त्यांच्यात सुधारणा होण्याची शक्यता असते. मात्र अज्ञानी जेव्हा अधिकारपद ग्रहण करतो तेव्हा त्याच्यात मी सांगतो तेच खरे असा अहंभाव निर्माण होतो व तो कोणाचेच म्हणणे ऐकूण घेण्यास (वा समजून घेण्यास) तयार होत नाही. मात्र सर्वसामान्य जनता योग्यरीत्या समज दिल्यास ऐकूण घेण्यास व दुष्ट लोकांच्या प्रभावात न येण्याची खबरदारी बाळगू लागते. वाममार्गी लोकांचा गट अशाच सामान्य जनतेची मोठ्या शिताफीने दिशाभूल करून आपल्या दुष्ट विचारांचा प्रचार करीत असतात.

आम जनतेसमोर सत्य परिस्थिती प्रस्तुत करून त्यांच्यात जागृती निर्माण करावी हाच या वक्तव्याचा खरा उद्देश आहे.

## इस्लाम म्हणजेच सर्वंकष न्यायव्यवस्था होय

'इस्लाम धर्मातसुध्दा सामाजिक न्यायव्यवस्था अस्तित्वात आहे' असा जे लोक प्रचार करतात तो पूर्णत: असत्य आहे. खरे म्हणजे **'इस्लाम हीच सामाजिक न्यायव्यवस्था आहे.'**

सृष्टीचा सृजनकर्ता व संपूर्ण विश्वाचा पालनकर्ता अल्लाहने मानवसमाजाच्या मार्गदर्शनाकरिता इस्लाम अवतरित केला आहे. लोकांमध्ये न्यायबुध्दी निर्माण करणे व कोणती बाब न्यायोचित वा अन्यायकारक आहे हे निश्चित करणे केवळ अल्लाहच्या अधिकारातील बाब आहे. त्याच्याशिवाय दुसरा कोणी न्याय व अत्याचाराची व्याख्या करून वास्तविक न्यायव्यवस्था स्थापित

करू शकेल असा विश्वास करणे ही चुकीची भावना आहे. मनुष्य स्वतः आपलाच मालक व शासक होऊ शकत नाही. जगात मानवाचे अस्तित्व अल्लाहच्या प्रजेसमान आहे, म्हणून न्यायव्यवस्था कायम करणे मानवाच्या अधिकारात नसून त्याचा मालक व सृष्टीला नियंत्रित करणाऱ्या अल्लाहच्या अधिकारात आहे. मानवाची बौध्दिक क्षमता सीमित आहे. त्याची आकलनशक्ती कमकुवत आहे, त्याच्या आशाआकांक्षाचे दडपण त्याच्या बुध्दीवर असते त्यामुळे कितीही बुध्दिमानाने प्रयत्न केल्यास तो ईश्वरी अधिकार प्राप्त करू शकत नाही. कोणत्याही परिस्थितीत मनुष्य स्वतः आपल्या समाजाकरिता अशी व्यवस्था स्थापित करू शकत नाही, जी पूर्णतः न्यायोचित ठरू शकेल. मानवाने तयार केलेली व्यवस्था सुरूवातीला कितीही योग्य व न्यायोचित दिसत असली तरी अल्प काळातच ती न्यायोचित नाही हे सिध्द होते. म्हणून मानवनिर्मित समाजव्यवस्था अल्पावधीतच निरर्थक सिध्द होते व मनुष्य निराश होऊन दुसऱ्या समाजव्यवस्थेचा प्रयोग करू लागतो. ईश्वर (अल्लाह) जो सर्वज्ञ, सर्वव्यापी, सर्वशक्तिमान आहे तोच सर्वंकष न्यायोचित समाजव्यवस्था निर्माण करू शकतो.

## न्याय हेच इस्लामचे उद्दिष्ट

'इस्लाममध्ये न्याय आहे' असे मत मांडणारा अर्धसत्य व्यक्त करीत असतो. खरे सांगायचे म्हणजे **'न्याय हेच इस्लामचे उद्दिष्ट आहे.'**

इस्लामचे अवतरण मूलतः जगात न्याय स्थापित करण्याकरिता झाले आहे. कुरआनोक्ती आहे,

*''आम्ही प्रेषितांना अगदी स्पष्ट संकेतचिन्हे व सूचनांसहित पाठविले आहे व त्यांच्यासोबत ग्रंथ व तुला (न्याय) पाठविली आहे, जेणेकरून मनुष्याने न्यायाने वागावे व आम्ही लोखंडही पाठविले (पुरविले) आहे जे अत्यंत मजबूत असून ते लोकांच्या उपयोगाचे आहे. याकरिता की अल्लाह जाणून घेऊ इच्छितो की त्याला न पाहताही कोण त्याची व त्याच्या प्रेषितांची सहायता करतो. निश्चितच अल्लाह शक्तिमान व जबरदस्त आहे.*
*कुरआन, अलहदीद - २५*

या दोन गोष्टींबाबत जर मुस्लिमांनी दुर्लक्ष केले नाही, तर त्यास अल्लाह व त्याचे प्रेषित (मुहम्मद स.) यांच्याशिवाय इतर कोणाकडे सर्वंकष न्याय शोधण्याची गरज भासणार नाही. ज्या क्षणी त्याला न्यायाची गरज भासेल त्याच क्षणी त्याच्या लक्षात येईल की न्याय अल्लाह व त्याच्या प्रेषिता (मुहम्मद स.) शिवाय इतर

कोणाकडून मिळूच शकत नाही. न्यायोचित समाजव्यवस्था कायम करण्याकरिता दुसरे कोणतेच उपाय न करता, इस्लाम (संपूर्ण इस्लाम जरासुध्दा उणे अधिक न करता) अंमलात आणायला हवा. न्याय इस्लामशिवाय इतर कोणत्याच व्यवस्थेत आढळणार नाही.

**इस्लाम म्हणजेच न्याय, इस्लाम अंमलात येणे म्हणजेच न्यायोचित व्यवस्था कायम होणे होय!**

## सर्वंकष न्याय

आता आपण पाहू या की सर्वंकष न्याय वस्तुत: आहे तरी काय व ते कसे अंमलात येऊ शकते?

## मानवी व्यक्तिमत्त्वाचे महत्त्व

हजारो लाखो व्यक्ती जेव्हा एकत्र येतात तेव्हा एका समाजाची निर्मिती होते. समाजाच्या प्रत्येक व्यक्तीचे आपले एक स्वतंत्र अस्तित्व असते. आपली वैचारिक व आचरणाची शैली असते. प्रत्येक व्यक्ती आपले व्यक्तिमत्त्व प्रभावकारी सिध्द करण्याच्या प्रयत्नात असते. प्रत्येकाच्या आपल्या विशिष्ट आवडी निवडी असतात, त्याच्या वेगवेगळ्या आशा–आकांक्षा असतात. त्याच्या स्वत:च्या शारीरिक व मानसिक गरजा असतात. त्याचे अस्तित्व निर्जीव मशीनसारखे नसून त्याच्या प्रत्येक अंगप्रत्यंगाचे महत्त्व असते. त्याचे अस्तित्व जितके महत्त्वाचे असते तितकेच त्याच्या प्रत्येक अंगप्रत्यंगाचे अर्थात अवयवाचे महत्त्व असते. उलट असे म्हणता येईल की समाजातील प्रत्येक घटक एक संवेदनशील सजीव प्राणी असतो. व्यक्ती समाजाकरिता नसून समाज व्यक्तीसाठी असतो. कारण एकमेकांस सहकार्य प्राप्त व्हावे म्हणूनच समाजाची निर्मिती केली जाते. अशा सामाजिक सहजीवनाने व्यक्तीच्या शारीरिक व मानसिक गरजांची पूर्तता करणे सुकर होते.

## वैयक्तिक जबाबदारी

प्रत्येक व्यक्तीला व्यक्तीश: अल्लाहसमोर जाऊन जाब द्यावा लागणार आहे. प्रत्येक व्यक्तीस जगात एका ठराविक मुदतीसाठी परीक्षाकाल व्यतीत करावा लागेल व ते पूर्ण झाल्यानंतर त्याला त्याकाळातील कर्मांचा ईश्वरासमोर हिशोब द्यावा लागेल. त्याला प्राप्त झालेल्या शक्ती व क्षमतेचा उपयोग करून उपलब्ध साधन-सामुग्रीच्या आधारे त्याने आपल्या व्यक्तिमत्त्वास किती वैभव प्राप्त करून दिले आहे

हे दाखवून द्यावे लागेल. अल्लाहसमोर स्वत: व्यक्ती जबाबदार असेल. समाज व्यक्तीच्या वतीने जबाब देणार नाही. तेथे कुटूंब, जमात वा समाजाकडून हिशोब न घेता प्रत्येक व्यक्तीस त्याच्या नात्या–गोत्यातून मुक्त करून ईश्वर त्याला आपल्या समोर उभा करील व त्याच्या कृत्यांबद्दल विचारणा केली जाईल आणि त्याने आपल्या व्यक्तिमत्त्वास कोणते स्वरूप दिले आहे हे प्रकट करावे लागेल.

## व्यक्तीस्वातंत्र्य

प्रत्येक व्यक्तीच्या व्यक्तिमत्त्वाची घडण व जगाच्या अंतानंतर मानवाकडून घेतला जाणारा हिशोब या दोन्ही गोष्टींतून असा निष्कर्ष निघतो की प्रत्येक व्यक्तीस जगात व्यक्तीस्वतंत्र्य प्राप्त आहे. जर समाजात प्रत्येक व्यक्तीस त्याच्या व्यक्तिमत्त्वाचा उत्कर्ष साधण्याची पुरेशी संधी मिळाली नाही तर त्या व्यक्तीमधील क्षमता गोठली जाईल व त्याचे अस्तित्व गुदमरले जाईल. त्याची शक्ती व योग्यता निष्क्रिय होईल. तो स्वत:स बंदिस्त व असहाय्य जाणून नैराश्याच्या आहारी जाईल. जगाच्या अंता (कयामत) नंतर व्यक्तीला बंदिस्त व निराश करण्याची जबाबदारी समाजाच्या त्या लोकांवर लादण्यात येईल ज्यांनी समाजाची दुर्दशा केली असेल. अशा जबाबदार लोकांकडून केवळ त्यांच्या वैयक्तिक कर्मांचा हिशोब न घेता त्यांच्या सामाजिक जबाबदाऱ्यांबद्दलसुध्दा विचारणा केली जाईल. त्यांच्या स्वनिर्मित समाजव्यवस्थेमुळे समाजातील व्यक्तींना विवश होऊन स्वत:च्या इच्छेविरुध्द वागावे लागले होते व आपले व्यक्तिमत्त्व उजळ करण्यास ते असमर्थ झाले होते. निश्चितच कोणताही श्रध्दावान (ज्याचा अंतिम दिनावर विश्वास आहे) आपल्या खांद्यावर इतके मोठे ओझे घेऊन अल्लाहसमोर जाण्याचे धैर्य करणार नाही. तो जर ईशभय बाळगत असेल तर तो निश्चितच प्रत्येक व्यक्तीस जास्तीतजास्त स्वातंत्र्य देऊन स्वत:च्या इच्छेप्रमाणे आपल्या व्यक्तिमत्त्वास हवे तसे स्वरुप देण्याची मुभा देईल, जेणेकरून व्यक्तींच्या व्यक्तिमत्त्वाच्या वैफल्याचे आरोप समाजव्यवस्था संचालित करणाऱ्यांवर लादली जाणार नाही.

## सामाजिक संस्था व त्यांचे वर्चस्व

व्यक्तीस्वातंत्र्यानंतर आता आपण समाजाकडे वळू या. कुटुंबे, जाती-जमाती, विविध धर्मांच्या मानवाच्या एकत्रित अस्तित्वाने समाज निर्माण होतो. समाजनिर्मितीच्या कार्याची सुरूवात स्त्री–पुरूषाच्या एका जोडप्यापासून झाली. त्याचे रूपांतर एका कुटुंबात झाले, अनेक कुटुंबांनी एकत्र येऊन गट (जात) व

वंश निर्माण केले आणि पुढे त्यांचा विस्तार होऊन एक समाज निर्माण झाला. समाजाने आपल्या सामूहिक उद्दिष्टांच्या पूर्तीसाठी राज्यव्यवस्थेची स्थापना केली. या राज्य संस्थांची स्थापना केल्याने व्यक्तींना सुरक्षा व सहाय्यता प्राप्त झाली, ज्याच्या आधारे त्यास आपली वैयक्तिक उद्दिष्टे प्राप्त करता आली जी त्याला एकट्याला प्राप्त करता आली नसती. मात्र ही व्यवस्था सफल होण्याकरिता प्रत्येक संस्थेस व्यक्तींवर, प्रत्येक मोठ्या संस्थेस छोट्या संस्थेवर वर्चस्व प्राप्त असणे आवश्यक आहे. अशा प्रकारे व्यक्तीच्या स्वातंत्र्यास लगाम लावून तिच्यापासून इतरांना होणाऱ्या अत्याचारास आळा घालता येईल व व्यक्तीच्या सेवेने संपूर्ण समाजाचा उत्कर्ष साधता येईल. येथूनच सामाजिक न्यायव्यवस्थेच्या प्रश्नाचा उगम होतो व वैयक्तिक व सामाजिक विरोधात्मक मागण्यांचा गुंता निर्माण होऊ लागतो. एका बाजूला अशी अपेक्षा केली जाते की मानवी कल्याणासाठी प्रत्येक व्यक्तीला इतके स्वातंत्र्य प्राप्त असावे की त्याला आपल्या योग्यते व इच्छेप्रमाणे आपली प्रगती करता यावी. याचप्रमाणे प्रत्येक कुटुंबास, वंशास, जाती-जमातीस व विविध गटांस आपापल्या कक्षेत राहून स्वतंत्र वातावरणात जास्तीतजास्त उन्नती करता यावी. मात्र त्याचबरोबर अशी अपेक्षा केली जाते की व्यक्तीवर कुटुंबाचे, कुटुंबांवर जाती-जमातीचे व सर्व व्यक्ती व संस्थांवर राज्य शासनाचे वर्चस्व व नियंत्रण असायला हवे, जेणेकरून कोणीही दुसऱ्यांच्या हक्कांवर अतिक्रमण करून त्यांच्यावर अन्याय व अत्याचार करू शकणार नाही. पुढे जाऊन अशीच समस्या संपूर्ण मानवजातीच्या बाबतीतसुद्धा निर्माण होते की प्रत्येक समाजाचे व राज्याचे सार्वभौमत्व व स्वातंत्र्य अबाधित राहिले पाहिजे व त्या सर्वांवर अधिक शक्तिमान संस्थेचे नियंत्रण असणेसुद्धा आवश्यक असते. या व्यवस्थेमुळे सामाजिक गट व राज्यव्यवस्था कोणावरही नाहक अत्याचार करू शकणार नाहीत.

व्यक्ती, कुटुंब, जाती-जमाती व समाजाला आवश्यक स्वातंत्र्य प्राप्त असावे व जुलूम-जबरदस्तीला आळा बसावा म्हणून सामाजिक संस्थाना नियंत्रण करण्याचे अधिकार प्राप्त असतात. सामाजिक संस्था व व्यक्तीकडून जनकल्याणाच्या सेवाही प्राप्त करता येतात. अशा प्रकारे समाजव्यवस्था स्थापित होते.

## भांडवलदारी व साम्यवादातील त्रुटी

उपरोक्त विवरण ज्याला समजले असेल त्याच्या सहज लक्षात येईल की

व्यक्तीस्वातंत्र्य, उदारमतवाद, भांडवलदारी व धर्मनिरपेक्ष लोकशाही (जी फ्रान्सच्या क्रांतीनंतर अस्तित्वात आली होती) ज्याप्रमाणे न्यायोचित समाज व्यवस्थाविरोधी आहे त्यापेक्षा अधिक कार्ल मार्क्स व एंजेल्स तत्त्वज्ञानातून निर्माण झालेला साम्यवादही त्याच्या विरोधात आहे. पहिल्या समाजव्यवस्थेने व्यक्तीस घटनेपेक्षा जास्त स्वातंत्र्य देऊन कुटुंब, जमात व समाजावर अतिरेकी वृत्तीने वागण्याची सूट दिली होती. त्यामुळे समाजाची सार्वजनिक कल्याणकारी सेवा प्राप्त करण्याची नियंत्रणशक्ती क्षीण झाली होती. दुसऱ्या समाजव्यवस्थेत असा दोष होता की त्याने शासनव्यवस्थेस इतके सशक्त करून टाकले होते की त्यामुळे व्यक्ती, कुटुंब, जाती-जमातीचे स्वातंत्र्य जवळजवळ हिरावून घेतले होते व लोकांना राबवून घेण्याचे इतके जबरदस्त अधिकार शासकास प्राप्त झाले होते की व्यक्ती सजीव प्राणी न राहता यंत्राच्या निर्जीव साहित्य-सामुग्रीसमान झाली होती. अशा प्रकारच्या समाजव्यवस्थेने न्यायोचित समाजव्यवस्था स्थापित करता येते, असे विधान असत्य असल्याचे निदर्शनास येते.

## "साम्यवाद म्हणजे सामाजिक अन्यायाचे रुद्र स्वरुप होय?"

साम्यवाद सामाजिक अन्यायाचे भयंकर रुद्र स्वरुप आहे. इस्लामी इतिहासानुसार इराकचा राजा नमरूद व इजिप्तचा शासक फिरऔन हे महा-अत्याचारी हुकूमशाह होते. साम्यवादाने त्यापेक्षा भयंकर अत्याचार घडवून आणले. साम्यवादास कोणताही समंजस माणूस न्यायोचित मानणार नाही. साम्यवाद म्हणजे एका व्यक्तीने वा समूहाने निर्माण केलेली समाजव्यवस्था जिच्या आधारे राज्यसत्ता बळकावून अमर्याद अधिकार प्राप्त करून देशातील कोट्यवधी लोकांवर जबरदस्तीने आपल्या तत्त्वप्रणालीचे दडपण निर्माण करायचे, लोकांची मालमत्ता जप्त करून त्यांच्या जमिनी व कारखान्यांना सार्वजनिक मिळकतीचे स्वरुप द्यायचे. संपूर्ण देशात कैदखान्यासमान परिस्थिती निर्माण करायची, तेथे कोणत्याच प्रकारची टीकाटिपणी करण्याची मनाई असते. कोणतीच तक्रार करता येत नाही, न्यायालयीन पध्दत संपुष्टात आणली जाते, देशात कुठलाच पक्ष वा सामाजिक संस्था अस्तित्वात राहत नाही. कोणत्याच मंचावरून आपले मत व्यक्त करता येत नाही, पोलीस बंदोबस्त नसतो. दाद-फिर्याद मागण्याची कोणतीच व्यवस्था नसते, हेरगिरीचे जाळे इतके भयंकर असते की एक व्यक्ती दुसऱ्या व्यक्तीकडे संशयाने पाहत असते. परस्पर विश्वास संपुष्टात येतो, घरात आपसात

बोलतानासुध्दा खबरदारी बाळगावी लागते व राज्यसत्तेची भीती मनाला सतत भेडसावत राहते. लोकांची दिशाभूल करण्याकरिता निवडणुका आयोजित केल्या जातात, मात्र साम्यवादाचा विरोध करणारी कोणतीच व्यक्ती निवडणुकीत भाग घेऊ शकत नाही. स्वतंत्रपणे विचार करणाऱ्या व्यक्तीस त्यात सहभागी होता येत नाही. जिचा विवेक जागृत आहे अशा व्यक्तीस निवडणुकीत भाग घेण्याची संधी दिली जात नाही.

आजपर्यंत कोणत्याच समाजव्यवस्थेने आर्थिक समानता अस्तित्वात आणलेली नाही. समजा, साम्यवादाने जरी ते शक्य करून दाखविले तरी त्यास न्यायोचित आर्थिक समानता मानता येईल का? मी हा प्रश्न निर्माण करू इच्छित नाही की साम्यवादी शासक व जनतेत आर्थिक समानता अस्तित्वात असते किंवा नाही. साम्यवादी हुकूमशाह व त्याच्या अधिपत्याखाली राहणाऱ्या शेतकऱ्यांचे जीवनमान समान असू शकते की नाही याबाबतही मी विचारणा करू पाहत नाही. मला फक्त एवढेच विचारायचे आहे की सर्व लोकांत केवळ आर्थिक समानता निर्माण झाली तरी ती न्यायोचित समाजव्यवस्था होईल का? देशाच्या हुकूमशाह व त्याच्या साथीदारांची एक तत्त्वप्रणाली निर्माण करून ती जोरजबरदस्तीने पोलीस, सैन्य, हेरगिरीच्या सहाय्याने लोकांवर लागू करावी. मात्र समाजातील कोणत्याही व्यक्तीने त्या तत्त्वप्रणालीचा विरोधच नव्हे तर एखाद्या चुकीच्या कृतीबाबत तोंडातून एक शब्दही काढता कामा नये. हा उघड अन्याय नाही काय? हुकूमशाह व त्याच्या साथीदारांना त्यांच्या तत्त्वास अनुसरून देशाच्या उत्पन्नाचा सुखसंपन्नतेचा उपयोग करून, वाटेल तशी व्यवस्था करण्याकरिता सर्व प्रकारच्या संस्था व संघटना स्थापन करण्याचा अधिकार असेल. मात्र समाजातील वेगळ्या विचाराच्या दोन व्यक्तीसुद्धा कुठल्याच सभेस संबोधू शकणार नाही. कुठल्याच वृत्तपत्रात विचार मांडू शकणार नाहीत. हा जुलूम नाही काय? देशातील सर्व जमीनदारांना तसेच सर्व कारखानदारांना मिळकतीपासून वंचित करून संपूर्ण मालकी व व्यवस्थापन शासकवर्गाच्या हातात एकवटले जाते व त्यांनी कायद्याच्या तरतुदींच्या आधारे सर्वच्या सर्व मिळकती कोणत्याच प्रकारे इतर कोणाच्याच ताब्यात जाऊ शकणार नाहीत असे उपाय योजावे, ही व्यवस्था न्यायोचित मानता येईल काय? केवळ पोट भरणे व त्यासाठीच काम करणे हेच जीवनाचे उद्देश नसल्याने अशा आर्थिक समानतेस न्यायोचित कसे मानता येईल? जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात जुलूम-जबरदस्तीने समानता निर्माण करण्यासाठी, मानवतेची गळचेपी करून जरी मालमत्तेचे समान वाटप करण्यात आले व हुकूमशाहांचे जीवनमानसुद्धा

जनतेसारखे झाले तरी अशा प्रकारच्या समानतेने न्यायोचित समाजव्यवस्था स्थापित होईल असे वाटत नाही. माझ्या मतानुसार ही व्यवस्था मानवी इतिहासात कधी न घडलेली भयानक जुलमी समाजव्यवस्था सिध्द होईल.

## इस्लामी न्यायप्रणाली

आता मी 'इस्लामनुसार न्याय म्हणजे काय?' याची संक्षिप्त माहिती देत आहे. इस्लामने कोणा एका व्यक्तीस वा समूहास मानवी जीवनाकरिता न्यायाची तत्त्वे निर्धारित करण्याचे वा त्यांची सक्तीने, कोणत्याही विरोधास न जुमानता, त्यावर अंमलबजावणी करण्याचा अधिकार दिलेला नाही. असे अधिकार तर माननीय अबू बकर सिद्दीक (रजि.) व माननीय उमर फारूक (रजि.) यांनाही प्राप्त नव्हते. एवढेच काय स्वत: प्रेषित मोहम्मद (स.) यांनाही प्राप्त नव्हते. इस्लामला हुकूमशाही मुळीच मान्य नाही. मानवाने कोणताच संकोच व शंकाकुशंका उपस्थित न करता ईश्वरासमोर नतमस्तक व्हायला हवे. प्रेषित मुहम्मद (स.) ईश्वराच्या अधीन होते. म्हणून त्यांच्या उपदेशांवर आचरण करणे क्रमप्राप्त कर्तव्य आहे, कारण ते जे काही सांगत असत ईश्वराच्या आज्ञेनुसार सांगत असत. ते आपल्या मर्जीनुसार कोणत्याच तत्त्वप्रणालीची रचना करीत नसत. प्रेषित मुहम्मद (स.) व खलीफांच्या कार्यकाळात ईश्वरी आज्ञेविरुद्ध टीका करण्याची आज्ञा नव्हती. मात्र त्याव्यतिरिक्त कोणत्याही बाबतीत प्रत्येक नागरिकास बोलण्याचा अधिकार प्राप्त होता.

## व्यक्तीस्वातंत्र्याच्या मर्यादा

अल्लाहने इस्लाममध्ये ज्या मर्यादा निर्धारित केल्या आहेत त्यात व्यक्तीस्वातंत्र्यावर स्वाभाविक सीमा आखण्यात आल्या आहेत. एका मुस्लिम व्यक्तीने कोणत्या दुष्कर्मापासून अलिप्त राहिले पाहिजे व कोणती कर्तव्ये पार पाडली पाहिजेत याबद्दल निश्चित स्वरुपाचे आदेश देण्यात आले आहेत. त्यांचे इतरांवर कोणते हक्क (अधिकार) आहेत व इतरांचे त्यांच्यावर कोणते हक्क असतील याबाबत स्पष्ट आदेश देण्यात आले आहेत. कोणत्या मार्गाने संपत्ती संपादित करणे वैध आहे व कोणत्या मार्गाने धनसंपत्ती प्राप्त करणे अवैध आहे. लोकांच्या कल्याणासाठी समाजाची कोणती कर्तव्ये आहेत व समाजाच्या कल्याणासाठी लोकांची कोणती कर्तव्ये आहेत, कुटुंबे व जमातींवर तसेच संपूर्ण समाजावर कोणती बंधने लादण्यात आली आहेत व त्यांनी कोणत्या सेवा उपलब्ध करून

द्यायच्या आहेत या सर्व बाबींचा शरियतच्या नियमावलीत समावेश करण्यात आला आहे. त्यात कोणी सुधारणा करणार नाही. त्यात कमी-जास्त फरक करण्याचा कोणासही अधिकार नाही. या नियमावलीद्वारा व्यक्तीस्वातंत्र्यावर जी बंधने निर्धारित करण्यात आली आहेत त्यांचे उल्लंघन करण्याचा व्यक्तीला अधिकार नाही. उलट त्यांच्या सीमेच्या आत राहून जितके स्वातंत्र्य त्याला भोगता येते ते हिरावून घेण्याचे कोणालाच अधिकार नाहीत. ज्या मार्गाने धनार्जन करणे व ज्या मार्गाने ते खर्च करणे वर्ज्य करण्यात आले आहे त्या अटींचे पालन करायला हवे. जर त्याने उल्लंघन करण्याचे दुस्साहस केलेच तर तो शिक्षेस पात्र ठरतो. मनुष्याला मिळणारा वारसाहक्क, बक्षीस व दान तसेच स्वप्रयत्नाने प्राप्त केलेले धन वैध मानले गेले आहेत. वारसाहक्कही तेच वैध ठरू शकते जे खऱ्या (कायदेशीर) मालकाकडून धर्माच्या (शरियत) नियमानुसार मिळाले असेल. मिळकतीच्या कायदेशीर मालकाकडून धर्माच्या नियमानुसार मिळालेले बक्षीस व दान वैध मानले जाईल. शासनाकडून मिळणारी देणगी वा आर्थिक मदत जर कोणत्यातरी कामाच्या मोबदल्यात किंवा समाजाच्या हिताच्या दृष्टीने निर्धारित नियमानुसार दिली गेली असेल तर ती वैध मानली जाईल. तसेच जे सरकार नियमानुसार सल्लामसलतीने चालत असेल व जे जनतेस हिशोब देण्यास उत्तरदायी असेल तेच सरकार बक्षीस वा अनुदान देण्यास पात्र मानले जाईल. कोणत्याही रास्त मार्गाने केलेली कमाई वैध मानण्यात येईल. चोरी, दरोडा, अफरातफर, बेईमानी, वजन-मापात फसवेगिरी करणे, भ्रष्टाचार, वेश्याव्यवसाय, साठे बाजी, व्याजबट्ट्यांचा व्यवहार, जुगार, विश्वासघात, अमली पदार्थांची तस्करी व अश्लील जाहिरातीपासून मिळालेले उत्पन्न इस्लाममध्ये अवैध (हराम) मानले जाते. या सर्व बंधनांचे पालन करून मिळविलेले उत्पन्न वा मिळकत वैध मानली जाते, मग ती जास्त असो वा कमी. अवैध वा वैध रकमेच्या बाबतीत कमी-जास्त अशी मर्यादा (वा सूट) निश्चित करण्यात आलेली नाही. दुसऱ्यांकडून बळजबरी हिसकावून घेऊन स्वत:ची मालमत्ता वाढविण्याचीही अनुमती देण्यात आलेली नाही. उलट मर्यादेपलीकडे धनदौलत साठविली गेल्यास मुस्लिम त्या धनवानाला ही दौलत तुला कुठून मिळाली याबाबत विचारणा करू शकतात. वैधरीत्या कमविलेल्या संपत्तीवर व्यक्तीचा निर्विवाद हक्क असतो व तो आपल्या मर्जीनुसार ती संपत्ती वैधरीत्या खर्च करू शकतो. त्याबाबत विचारणा करण्याचा कोणासही अधिकार नाही. त्याचप्रमाणे समाजाच्या कल्याणासाठी जी कर्तव्ये लोकांवर लागू करण्यात आली आहेत ती तर त्यांना पार पाडावीच लागतील, मात्र त्यापेक्षा

अधिक ओझे त्यांच्यावर लादण्याची बळजबरी करता येत नाही. मात्र त्याची इच्छा असल्यास तो ते कार्य करू शकतो. हेच नियम समाज व राज्य व्यवस्थेस लागू आहेत. जी कर्तव्ये पार पाडण्याची जबाबदारी त्यांच्याकरिता अनिवार्य करण्यात आली आहेत ती पूर्ण करणे त्यांचे आद्य कर्तव्य आहे. अशा प्रकारच्या नियमांची काटेकोरपणे अंमलबजावणी होऊ लागल्यास न्यायोचित समाजव्यवस्था प्रस्थापित करण्यात कोणतीच अडचण निर्माण होण्याची शक्यता राहणार नाही. या नियमावलीचा अंमल चालू राहील तोवर कोणीही भागीदारी (साम्यवादा) च्या उधार घेतलेली तत्त्वे इस्लामी वा 'इस्लामिक सोशलिझम' समान असल्याचे सांगून मुस्लिमांची दिशाभूल करू शकणार नाहीत.

इस्लामच्या या न्यायोचित समाजव्यवस्थेने व्यक्ती व समाजात असे संतुलन निर्माण केले आहे की ज्यामुळे व्यक्तीस एवढे स्वातंत्र्य प्राप्त होत नाही की ते समाजविघातक सिद्ध होतील. तसेच समाजासही इतके अधिकार देण्यात आलेले नाहीत की ज्यामुळे लोकांचे व्यक्तीस्वातंत्र्य हिरावले जाईल व व्यक्तीला आपला उत्कर्ष साधणेही कठीण वाटू लागेल.

## संपत्ती जप्त करण्याबाबतच्या अटी

इस्लामच्या तत्त्वांनुसार व्यक्तीची संपत्ती जप्त करण्याबाबत तीन अटी आहेत- १) त्यांच्या संपत्तीबाबत पूर्ण चौकशी करणे, २) ती वैधरीत्या प्राप्त झाली नसल्याचे सिध्द होणे आणि ३) अशी संपत्ती इस्लामी राज्याने जप्त करावी.

## संपत्तीच्या विनियोगाबाबतच्या अटी

वैधरीत्या प्राप्त केलेल्या संपत्तीचा व्यय (खर्च) करण्याबाबतही व्यक्तीस पूर्ण सूट देण्यात आलेली नाही. उलट त्याच्यावर काही कायदेशीर बंधने लादण्यात आली आहेत, ज्यांच्यामुळे तो अशा प्रकारे आपल्या धनसंपत्तीचा दुरुपयोग करणार नाही की ज्यामुळे समाजावर अनिष्ट परिणाम घडून येतील किंवा स्वत: त्या व्यक्तीचे नैतिक व धार्मिक पतन घडून येईल. इस्लाम कोणत्याही व्यक्तीस आपल्या संपत्तीचा दुष्कर्मासाठी उपयोग करण्याची अनुमती देत नाही. मद्यपान व जुगार खेळण्याबाबत सक्त मनाई करण्यात आली आहे. व्याभिचारास बंदी करण्यात आली आहे. स्वतंत्र लोकांना पकडून त्यांना गुलाम वा दासी म्हणून बाळगण्याचे किंवा त्यांचे क्रय-विक्रय करून श्रीमंताच्या घरात दासींचा भरणा करण्याची मुभा देण्यात आलेली नाही. वाटेल तसे खर्च करण्याची व ऐशआरामात लोळत राहण्याबाबतही

मनाई करण्यात आली आहे. इस्लामला हेही मुळीच मान्य नाही की तुम्ही ऐशआरामात लोळत राहावे व शेजाऱ्याने उपाशीपोटी रात्र घालवावी! इस्लाम संपत्तीद्वारा केवळ वैध व योग्य असा लाभ घेण्याचा आदेश देतो. एखाद्यास गरजेपेक्षा जास्त धनसंपत्ती गोळा करायचीच असेल तर त्याने वैध मार्गानेच कमाई करायला हवी. तो धनार्जनासाठी अवैध मार्गाचा अवलंब करू शकत नाही.

## समाजसेवा

ज्या व्यक्तीकडे ठराविक रकमेपेक्षा जास्त रक्कम वा संपत्ती असेल त्याच्यावर समाज कल्याणासाठी जकात देणे अनिवार्य करण्यात आले आहे. त्याचप्रमाणे व्यापार, शेती, पशुपालन व इतर उत्पन्नावर निश्चित केलेल्या दराप्रमाणे जकात देण्याबाबत आदेश दिले गेले आहेत. जगातल्या कोणत्याही देशाला निवडून अंदाज करा की जर निश्चित केलेल्या दराप्रमाणे लोकांनी प्रामाणिकपणे जकात अदा केली व कुरआनाच्या आदेशानुसार एकत्रित रकमेचे योग्य त्या उद्देशासाठी वाटप करण्यात आले तर अल्प मुदतीतच त्या देशात एकही गरजवंत वंचित राहणार नाही.

मृत्यूसमयी जर एखाद्याकडे संचित संपत्ती शिल्लक असेल तर ती वारसाहक्कानुसार वाटप करण्याची योजनाही उपलब्ध करण्यात आली आहे. या व्यवस्थेमुळे धनसंपत्ती कायमस्वरूपी एकाच ठिकाणी गोठून राहत नाही.

## अन्यायकारक समस्यांचे निराकरण

जमीनदार वा कारखानदार व त्यांच्या मजुरांमध्ये सर्व समस्या सामंजस्याने व आपापसात बोलणी करून योग्य मार्गाने सुटाव्यात व त्यांच्यावर कायद्याचे दडपण निर्माण करण्याची गरज भासू नये अशी इस्लामची अपेक्षा आहे. मात्र ज्या ठिकाणी जुलूम वा अन्याय होत आहे तिथे इस्लामी शासनव्यवस्था मध्यस्थी करू शकेल व अन्याय दूर सारण्यासाठी आवश्यक कायदेशीर कारवाई करून समस्या निवारण करू शकते.

## सार्वजनिक कल्याणासाठी सार्वजनिकरणाच्या अटी

शासनाने कोणतेच उद्योग वा व्यापार आपल्या अधीन करू नये असा इस्लामी दृष्टिकोन नाही. जर एखादा उद्योग वा व्यापार जनकल्याणकारी असूनही लोक चालवू इच्छित नसतील किंवा ते लोकांनी चालविल्यास जनतेच्या दृष्टीने

हितकारक ठरणार नसेल तर ते शासनाने आपल्या ताब्यात घ्यायला हरकत नाही. तसेच जर लोकांमार्फत चालवला जाणारा एखादा उद्योग जनहिताच्या दृष्टीने नुकसानदायक असेल तर सरकार त्या लोकांना त्याचा मोबदला देऊन उद्योग आपल्या ताब्यात घेऊन योग्य अशा पध्दतीने संचालित करू शकते. अशा योजना हाती घेण्याबाबत कोणतीच कायदेशीर (शरियतची) अडचण नाही. मात्र उत्पन्नाच्या सर्व संस्था शासनाच्या अधीन असाव्यात व शासनाचेच सर्व प्रकारच्या उद्योग धंद्यांवर तसेच भूभागावर मालकी असावी असे तत्त्व इस्लामला मान्य नाही.

## सार्वजनिक एकत्रित निधीच्या खर्चावरील नियंत्रण

सार्वजनिक एकत्रित निधी (बैतुलमाल) वर अल्लाह व मुस्लिमांचा हक्क आहे असा इस्लामी दृष्टिकोन आहे. ही संपत्ती कोणतीही व्यक्ती स्वत:च्या मर्जीनुसार खर्च करू शकत नाही. मुस्लिमांच्या इतर निर्धारित कार्यपध्दतीनुसार सार्वजनिक एकत्रित निधी (बैतुलमाल) चा स्वतंत्ररीत्या नियुक्त प्रतिनिधींच्या सल्ल्यानुसार विनियोग करायला हवा. दान देणाऱ्यांची संपत्ती रास्त मार्गाने मिळवलेली असली पाहिजे व एकत्रित निधीचा खर्चसुध्दा वैध मार्गाने झाला पाहिजे. या संपूर्ण जमाखर्चावर मुस्लिमांना जाब विचारण्याचा अधिकार असेल.

## एक प्रश्न

या विषयाची सांगता करताना मला आपणास विचारावेसे वाटते की जर सामाजिक न्यायाचा अर्थ 'आर्थिक न्याय' असा होत असेल तर इस्लामने प्रस्तुत केलेला आर्थिक न्याय पुरेसा व योग्य वाटत नाही काय? ही व्यवस्था उपलब्ध असताना सर्व नागरिकांचे स्वातंत्र्य हिरावून घेण्याची, लोकांच्या मिळकती जप्त करण्याची व संपूर्ण जनतेस मूठभर लोकांचे गुलाम बनविण्याची गरज आहे काय? या अर्थव्यवस्थेत अशी कोणती त्रुटी आहे की जिच्यामुळे मुस्लिमांना आपल्या देशात इस्लामी शरियत (कायद्या) नुसार परिपूर्ण इस्लामी राष्ट्रव्यवस्था निर्माण करता येत नाही व ईश्वरी आज्ञांचे परिपूर्ण पालन करणे शक्य होत नाही? आम्ही इस्लामी अर्थव्यवस्था अंमलात आणल्यास साम्यवादाचा विचार समूळ संपुष्टात येईल. उलट अंधकारात चाचपडत फिरणाऱ्या साम्यवाद्यांना इस्लामी अर्थव्यवस्था हवीहवीशी वाटू लागेल.

—०— समाप्त —०—